# बेनिटो जुआरेज

## आधुनिक मेक्सिकोचा हीरो



मूळ लेखक
रे बैन्स

रेखाटनं
ॲलन डेव्हिस

मराठी अनुवाद
नीलांबरी



मेक्सिकोमधल्या सिएरा डेल सुर पर्वतराजीवर दिवसाची पहिली किरणं पडली. सान पाब्लो गुआलताओ या गावातली सगळी माणसं अजून झोपेतच होती. मार्सेलिनो आणि ब्रिगेडा जुआरेज यांच्या घरातले मात्र सगळे जागे होते. ते एका महत्वपूर्ण घटनेची तयारी करत होते. जुआरेजच्या नुकत्याच जन्मलेल्या बाळाचा ख्रिश्चन पध्दतीत नामकरण विधी होणार होता. ती तारीख होती २२ मार्च १८०६ आणि बाळाचं नाव ठेवलं बेनिटो पाब्लो.

सगळी तयारी झाली होती. सिनिअर जुआरेज बाप्तिस्म्यासाठी घेऊन जायला आपल्या चिमुकल्या बाळाला हातात घेऊन दारात उभा होता. मारिया जोसेफा आणि रोझा या दोन बहिणींनी आपल्या झोपेत लोभस दिसणार्‍या भावाच्या गालावर ओठ टेकले. सेनोरा जुआरेजनं बाळाच्या मऊ मऊ गालांवरुन आपला हात हलकेच फिरवला. “तुम्ही परत यायची आम्ही वाट पहातो आहोत.. ”ती आपल्या नवर्‍याला म्हणाली. त्या दिवशी दुपारी बेनिटो पाब्लो जुआरेजचा सँटो थॉमस इक्स्टलान या छोट्याशा गावातल्या चर्चमध्ये बाप्तिस्मा झाला. त्याच्या कुटुंबापाशी तो सोहळा साजरा करायला किंवा ब्लँकेंट खरेदी करायला देखील पैसे नव्हते. सिनेटर जुआरेजकडे जेवढी काही नाणी होती ती त्यानं बाप्तिस्मा करणार्‍या धर्मगुरुला दिली.



आपल्याकडच्या नवजात बाळासाठी आपण एवढं तरी करु शकलो याचा जुआरेज कुटुंबाला आनंद झाला होता. त्या गावातल्या इतर २० कुटुंबांकडे तर तेवढेही पैसे नव्हते. सान पाब्लो गुआलताओ या गावात प्रत्येकाचं आयुष्य म्हणजे दारिद्य, उपासमार, आजारपणं याविरुध्दचा सततचा झगडा होता. जुआरेज कुटुंब त्यांच्या शेजारपाजारच्या लोकांसारखंच झेपोटेक इंडियन होते. त्यांचे पूर्वज हजारो वर्षांपासून मेक्सिकोच्या डोंगराळ भागात वास्तव्य करुन होते. ते शांतताप्रिय, कष्टाळू होते. ते शेती करत आणि मेंढ्या पाळत.

बाराव्या शतकात जेव्हा ॲझटेक लोकांनी मेक्सिकोवर आक्रमण केलं, तेव्हा झेपोटेक लोकांवर विजय मिळवणं सोपं नाही हे त्यांना कळलं. सोळाव्या शतकात स्पॅनिश लोकांनी मेक्सिकोवर आक्रमण केलं तेव्हाही त्यांना झेपोटेक लोकांच्या कडव्या जिद्दीला तोंड द्यावं लागलं.

झेपोटेक मुळात आक्रमक वृत्तीचे नव्हते. त्यांनी स्वत:हून इतर लोकांवर कधीच आक्रमण केलं नव्हतं. त्यांनी युध्दांमध्ये फक्त आपल्या जमिनींचं रक्षण केलं आणि कधीच हार पत्करली नाही. बेनिटो जुआरेजचा जन्म अशाच स्वाभिमानी, शांतताप्रिय आणि विजिगिषु वृत्तीच्या लोकांमध्ये झाला होता. याच परंपरेनं त्याचं आयुष्य घडवलं. नंतर जुआरेजनं मेक्सिकोचा जो कायापालट केला त्याची मुळं या परंपरेत सापडतात.

बेनिटोचं आयुष्य सुरुवातीपासूनच खडतर होतं. मोठा झाल्यानंतर त्यानं "मी माझ्या आईवडिलांना जाणून घेऊ शकलो नाही हे माझं दुर्दैव होतं. मी तीन वर्षांचा असतानाच ते मरण पावले. मग मी आणि माझ्या बहिणी पेड्रो पेरेज आणि जस्टा लोपेझ या आमच्या आजीआजोबांबरोबर रहायला लागलो. ते पण झेपोटेक इंडियनच होते" असं लिहून ठेवलं होतं.



बेनिटोची आई दुसर्‍या मुलाला जन्म देताना मरण पावली. सान पाब्लो गुआलताओमध्ये तेव्हा एकही डॉक्टर किंवा नर्सही नव्हती. बेनिटोचे वडील आपल्या बागेतली फळं घेऊन चाळीस मैल डोंगराळ भागातून चालत ओक्साका शहरात पोचले आणि बाजारात थकव्यानं कोसळून मरण पावले. मृत्यूच्या वेळेस त्या दोघांचंही वय तिशीच्या आतलं होतं.

बेनिटो सहा वर्षांचा असताना त्याचे आजीआजोबाही मरण पावले. तीन जुआरेज भावंडं परत एकदा बेघर झाली. त्यानंतर मारिया जोसेफा ओक्साकामध्ये जाऊन मोलकरणीची कामं करायला लागली. रोजा तरुण होती. ती लग्न करुन जवळच्या एका गावात रहायला गेली.



बेनिटोची रवानगी त्याचे काका बर्नार्डिनो यांच्याकडे झाली. बर्नार्डिनो जुआरेजकडे पर्वतरांगांमधला जमिनीचा एक तुकडा होता. तो लगुना एन्कांटाडा म्हणजे एनचांटेड झील या नावाच्या प्रदेशात होता. त्या प्रदेशाचं नाव सोडून मंत्रमुग्ध करणारं दुसरं काहीच नव्हतं. तो एक खडकाळ आणि वैराण प्रदेश होता. बर्नार्डिनोच्या बकर्‍यांना खायला पुरेल इतकं गवत तिथे जेमतेम उगवत होतं. बेनिटो आपल्या काकाला घरकामात मदत करायचा. जवळच्या एका तलावातून पाणी आणणं, बकर्‍यांचा चरायला नेणं अशी सगळी कामं तो पटापट शिकला.

तोपर्यंत बेनिटोला फक्त झेपोटेक भाषाच बोलता येत होती. कुटुंबातल्या लोकांशी आणि मित्रांशी बोलायला ती भाषा पुरेशी होती. पण मेक्सिकोतल्या अनेक लोकांची भाषा स्पॅनिश होती. स्पॅनिश येत नसेल तर दरिद्री शेतकरी यापलीकडे कोणाची उन्नती होणंच शक्य नव्हतं. पण झेपोटेकमधल्या कोणत्याही गावात शाळा नव्हती. शिक्षणाच्या अभावानं दारिद्र्याच्या जाचक बेड्या तोडणं शक्यच नव्हतं.

“आपले लोक या ठिकाणी हजारो वर्षांपासून रहात आले आहेत.” बर्नार्डिनो आपल्या पुतण्याला म्हणाला.. “पण संधीच्या अभावी आपण गरीबच राहिलो. तू हुशार आहेस आणि पटापट शिकतोस. देवानं तुला जे दिलं आहे त्याचा उपयोग करुन तू एक चांगलं आयुष्य जगावंस असं मला वाटतं. तू त्यासाठी स्पॅनिश भाषा शिकावीस, इतरही शिक्षण घ्यावंस. तू आयुष्यात बरंच काही करु शकतोस बेनिटो.. तू तुझं आयुष्य एक गरीब अशिक्षित माणूस म्हणून घालवू नकोस.”



बर्नार्डिनो जुआरेजला बेनिटोनं धर्मगुरु व्हावं असं वाटत होतं. एका गरीब झेपोटेक मुलानं जगात पुढे जाण्यासाठी तो उत्तम मार्ग होता. पण धर्मगुरु बनायचं असेल तर बेनिटोला सेमिनरीमध्ये जाऊन शिकायला हवं होतं. सेमिनरीत जायचं असेल तर स्पॅनिश शिकणं अनिवार्य होतं.



बर्नार्डिनोला थोडंफार स्पॅनिश येत होतं. तेवढं पुतण्याला शिकवण्याचा त्यानं प्रयत्नही केला. बेनिटोलाही शिकण्यात रुची होती. पण ते सोपं नव्हतं. जिवंत रहाण्यासाठीच त्याला प्रचंड श्रम करावे लागत होते. घरातली प्रत्येक वस्तू हातानं तयार करावी लागत होती. स्वतःच्या मेंढ्यांची लोकर स्वतः कापून त्या लोकरीपासून स्वतःचे कपडे देखील तो तयार करत होता.

जुआरेज रोजच्या जेवणातला प्रत्येक पदार्थ – केळी, पेअर, बीन्स, बटाटे, चणे सगळं घरासमोरच्या बागेत पिकवलेलं असायचं. स्वतः कष्ट करुन तो पीठ तयार करायचा. घरातल्या बागेतच मधमाशांच्या पोळ्यातला मध काढायचा. शेतीसाठी लागणारी अवजारंही ते स्वतःच तयार करायचे.



बेनिटो जुआरेज नंतरच्या आयुष्यात हे लहानपणचं कष्टप्रद जीवन कधीच विसरु शकला नाही. कधीकधी धान्य पिकायचंच नाही. ते वर्षं काढणं खूप मुष्किल व्हायचं. त्या वर्षी ते फक्त मॅग्वे नावाच्या कॅक्टसच्या खोडातलं साखरेसारखं गोड आणि पौष्टिक पाणी पिऊन काढावं लागायचं.

जुआरेज मॅग्वेसारखाच इतर झुडुपांचाही पूर्ण वापर करायचा. कॅक्टसपासूनचं पिटा नावाचा धागा काढायचा. पिटापासून कपडे आणि कागद तयार व्हायचा. जुआरेज मॅग्वेचे काटेदेखील सुई, टाचणी आणि खिळे म्हणून वापरायचा.



बेनिटो दिवसभर आपल्या कुटुंबासोबर कष्टाची कामं करायचा. स्पॅनिश किंवा काही शिकण्यासाठी त्याच्याकडे वेळ उरायचा नाही. बर्नार्डिनो, वारंवार आपल्या पुतण्याला म्हणायचा, “तू शाळेत जावंस. या हलाखीच्या परिस्थितीतून बाहेर यावंस अशी माझी खूप इच्छा आहे. न जाणो, तसा एक दिवस येईलही.”



पण तसा दिवस बेनिटोला काही नजरेसमोर दिसत नव्हता. तो १० वर्षांचा असल्यापासून काकानं त्याच्यावर मेंढ्यांच्या कळपाची जबाबदारी सोपवली. दिवसभर तो शेळ्या-मेंढ्या घेऊन तलावाशेजारी जायचा. तिथे त्याला एकाकी वाटायचं. मग त्या शेळ्या मेंढ्यांशी बोलत आणि चांगल्या आयुष्याची स्वप्नं बघत तो दिवस कंठायचा.

बेनिटोकडे दारिद्र्यातून बाहेर येऊन आयुष्यात काही करायचं असेल तर एक मार्ग होता. ज्या आईवडिलांना आपल्या मुलाच्या सिक्षणाचा खर्च झेपत होता, ते मुलांना ओक्सा या शहरात घेऊन जायचे. पण ज्या पालकांना हा खर्च झेपत नव्हता ते तिथल्या श्रीमंत माणसांकडे आपली मुलं नोकर म्हणून ठेवत. मात्र त्या मुलांना मालकानं शिकवणं अनिवार्य असायचं. लिहायला आणि वाचायला शिकायचं असेल तर तो एकच मार्ग होता.

“केवळ माझ्या गावात नाही तर इक्स्लान जिल्ह्यात हीच प्रथा होती” असं बेनिटोनं नंतर लिहून ठेवलं होतं. “याच कारणानं त्या वेळी शहरातल्या घरांमधले बरेचसे नोकर ही जिल्ह्यातली तरुण पोरंच होती. यावरुन मी शहरात जाऊनच काहीतरी शिकू शकेन या निष्कर्षापर्यंत आलो. काका मला याचसाठी राजधानीच्या शहरात जायला सांगत होता.”



बर्नार्डिनो काका शहरात जाऊ असं अनेकदा म्हणत. पण तो दिवस उजाडतच नव्हता. पण त्या दिवशी सगळं चित्रच बदलून गेलं.
१६ डिसेंबर १८१८ रोजी बारा वर्षांचा बेनिटो एका डोंगरावर मेंढ्यांचा कळप हाकत होता. त्या दिवशी सुमारे ११ बाजता खेचरं घेऊन जाणारा एक कळप तिथून गेला. “ते ओक्साकाहून आले आहेत का?” असं बेनिटोनं त्यांना विचारलं. त्यांनी या प्रश्नाला होकारार्थी उत्तर दिलं. मग बेनिटोनं त्यांना ओक्साकाबद्दल अनेक प्रश्न विचारले. खेचराच्या मालकानं त्याला शहरातली माणसं, भव्य इमारती आणि इतर डोळे दिपवणार्‍या गोष्टींच्या अद्‌भुत कथा ऐकवल्या. मग ते पुढच्या प्रवासाला लागले.





बेनिटो जेव्हा मेंढ्यांच्या कळपात परत आला तर एक मेंढरु कमी झालेलं दिसलं. त्यानं त्या डोंगराळ भागात मेंढरू खूप शोधलं. पण एका गवळ्याच्या मुलानं त्याला खेचर मालकानं त्याचं मेंढरु पळवल्याचं त्याला सांगितलं.

बेनिटोला त्या गप्पिष्ट माणसानं चांगलंच मूर्ख बनवलं होतं. एक मौल्यवान जनावर हरवल्याबद्दल बेनिटोला अपराधी वाटत होतं. बर्नार्डिनोकडे आधीच साधनसामुग्री कमी होती. पण जे काही होतं त्यातलं ते बेनिटोला देत असत. पण तरीही बेनिटोला मेंढरु हरवल्याबद्दल शिक्षा होईल अशी भीती वाटत होती. अस्ताला जाणार्‍या सूर्याकडे पहात डोंगरावर बसलेला बेनिटो चिंताग्रस्त झाला होता. बेनिटोनं मनोमन तिथून पळून जाण्याचा निश्चय केला. सूर्यास्तानंतर तो जेव्हा मेंढ्यांचा कळप घेऊन घरी आला तेव्हा त्याच्या डोक्यात एक सुस्पष्ट योजना आकार घेत होती.

दुसर्‍या दिवशी बेनिटो पहाटे उठला आणि ओक्साकाच्या दिशेनं चालायला लागला. ते ४० मैल पार करायला त्याला तो संपूर्ण दिवस लागला. अखेरीस तो जेव्हा शहरात पोचला तेव्हा तो प्रचंड थकला होता आणि भुकेनं त्याचा जीव कासावीस झाला होता. तिथे त्यानं डॉन अँटोनियो माजा कुठे रहातो त्याची चौकशी केली. मारिया जोसेफा ही बेनिटोची मोठी बहीण तिथे स्वयंपाकाचं काम करायची. त्या शहरात बेनिटो फक्त आपल्या बहिणीलाच ओळखत होता. तिला शोधण्याशिवाय त्याला पर्यायच नव्हता.



शेवटी त्याला माजाचं घर सापडलं. त्यानं आपल्या बहिणीला सगळं सांगितलं. डॉन अँटोनियोला तिनं ती सगळी कथा ऐकवली. “बेनिटो तिथे राहिला तर चालेल का?” असं विचारलं. “माझा भाऊ बेनिटो कष्टाळू आहे. तो सगळी कामं करायला तयार आहे. मारिया म्हणाली. ओक्साकामध्ये राहून शाळेत शिकावं अशी त्याची इच्छा आहे. तुम्ही आम्हाला मदत कराल का?” तिनं विचारलं.

डॉन अँटोनियोनं दुसरीकडे व्यवस्था होईपर्यंत आपल्या घरात रहाण्याची बेनिटोला परवानगी दिली. बेनिटोनं माजा कुटुंबियांची छोटी मोठी कामं करुन आपल्या कमाईला सुरुवात केली. घरात काम नसेल तेव्हा तो ओक्साकाच्या रस्त्यांवर फिरायचा. लोक कसे बोलतात, वागतात हे शिकायचा तो प्रयत्न करायचा. त्याच्या गावाच्या तुलनेत ओक्साकामधल्या इमारती आणि बागा कितीतरी सुंदर होते. तिथल्या बाजारात अनेक प्रकारच्या भाज्या, फळं, फर्निचर आणि विविध सामान विकायला ठेवलेलं असायचं. श्रीमंत माणसं उंची पोशाख घालून घोडागाड्यांमध्ये फिरत असत.

ओक्साकाला येण्याअगोदर बेनिटोनं केवळ छोट्या गावातल्या झेपोटेक इंडियन्सनाच पाहिलेलं होतं. आता त्याला मेक्सिकोतले इतरजण दिसत होते. मेक्सिकोमध्ये राज्यकर्ते क्रूर होते. तिथे बहुतेक लोकांवर अन्याय होताना त्याला दिसत होता. मेक्सिकोमधले निम्मे लोक मूळ अमेरिकन होते. ते झेपोटेक लोकांसारखेच होते. पण त्यांना जनावरासारखं वागवलं जायचं. त्यांना कायद्यानं कोणतेच अधिकार नव्हते. त्यांना शिक्षणाच्या संधी आणि उन्नती करुन घेण्याचे कोणतेच मार्ग उपलब्ध नव्हते.

मेक्सिकोतल्या जरा वरच्या स्तरावरच्या समूहाला मेस्टिझो म्हणत. मेस्टिझो वंश हा स्थानिक अमेरिकन आणि स्पॅनिश यांच्या संयोगानं तयार झाला होता. मेस्टिझो लोकांना त्यातल्या त्यात बरी वागणूक मिळायची. मेक्सिकोच्या राजकारणात मात्र त्यांनाही स्थान नव्हतं.



क्रेओल्स हा एक छोटा समूह होता. ते स्पॅनिश लोकांचे वंशज असले तरी त्यांचा जन्म मेक्सिकोमध्ये झालेला होता.

स्पेनमध्ये जन्म झालेल्या लोकांची संख्या मेक्सिकोमध्ये सर्वात कमी होती. ते मेक्सिकोवर राज्य करत होते. कायदा त्यांच्या हातात होता. पण मेक्सिकोतले कायदे भयंकर होते. स्पॅनिश आईवडिलांच्या पोटी मेक्सिकोत जन्माला आलेल्या मुलांना आईवडिलांच्या तुलनेत कमी अधिकार असायचे. त्यामुळे कायद्यानं मुलं आणि पालक यांच्यात शत्रुत्वच निर्माण व्हायचं.



बेनिटो लहान असताना मेक्सिको ही स्पेनची वसाहत होती. अमेरिका ही इंग्लंडची वसाहत असल्यामुळे अमेरिकन लोकांना जसा इंग्लंडच्या लोकांबद्दल राग होता तसाच राग मूळ मेक्सिकन लोकांना स्पॅनिश लोकांबद्दल होता. अमेरिकेनं १७७६ साली स्वातंत्र्यलढा देऊन युनायटेड स्टेटस ऑफ अमेरिका तयार झाली. स्पॅनिश लोकांच्या जुलमाला कंटाळून मेक्सिकनही तसंच स्वातंत्र्य मिळावं यासाठी आतुर होते.

स्पेननं कडक कायदे करुन मेक्सिकोवर आपली सत्ता कायम केली होती. स्पेनमध्ये ज्या वस्तूंचं उत्पादन होत होतं किंवा जी पिकं उगवत होती त्यापैकी कशाचंही  उत्पादन करायला किंवा पिकं उगवायला मेक्सिकन लोकांना बंदी होती. थोडक्यात यंत्र, कपडे, अवजारं अशा कित्येक वस्तू स्पेनमधूनच खरेदी केल्या जात होत्या. मेक्सिकोमध्ये फ्लॅक्स आणि हेंप ही दोन पिकं घ्यायला बंदी होती. (या दोन्हीचा उपयोग  कपडे आणि दोरी तयार करायला होतो.) मेक्सिकन लोकांना द्राक्षं किंवा तुती लावायलाही बंदी होती. रेशमाचे किडे तुती खाऊन पोसले जातात आणि त्यांच्यापासून रेशीम बनतं. मेक्सिकोमध्ये असलेल्या सोन्याचांदीच्या खाणी ही त्यांची खरी दौलत होती. स्पेनच्या राजेरजवाड्यांनी लाखो टन सोनं आणि चांदी आपल्या देशाच्या खजिन्यात पाठवलं होतं.

या सोन्याचांदीच्या बदल्यात मेक्सिकोच्या हाती काहीच लागलं नव्हतं. देशात कायद्यानं गुलामगिरी नसली तरी मेक्सिकन लोकांना गुलामासारखंच वागवलं जायचं. यामुळे देशात असंतोष माजला होता. १८१८ साली बेनिटो जुआरेज ओक्साकाला पोचला तेव्हा सरकारच्या विरोधात दोन आंदोलनं झाली होती. दोन्ही आंदोलनं सैन्यानं भरडली होती. त्यामुळे राज्यकर्त्यांविरुध्द लोकांचा संताप जास्त तीव्र झाला.



बेनिटोनं वयाच्या बाराव्या वर्षी शिक्षण सुरु केलं तेव्हा मेक्सिकोमध्ये असं अराजक माजलेलं होतं. डॉन अँटोनियो माजा यानं बेनिटोला आपल्या डॉन अँटोनियो सालानुएव्हाच्या घरात रहायला परवानगी दिली होती. डॉन अँटोनियो सालानुएव्हा हा भला आणि हुशार माणूस होता. धर्मनिष्ठ असलेला डॉन शिक्षणाचं महत्व जाणून होता. त्यामुळे बेनिटो नोकर असला तरी त्यानं शिकण्याची इच्छा व्यक्त केल्यावर त्यानं त्याला प्राथमिक शाळेत घातलं.

पुढच्या दोन वर्षांमध्ये बेनिटो चार इयत्ता उत्तीर्ण झाला. तो स्पॅनिश भाषा लिहायला आणि वाचायला शिकला. मूळ अमेरिकन लोकांना विशिष्ट विषयच शिकता येत होते. त्यापेक्षा बेनिटोला जास्त विषय शिकायचे होते. त्यासाठी चांगल्या शाळेत जायला हवं अशी त्यानं मागणी केली. डॉन अँटोनियोला ते पटलं. त्याला बेनिटोनं धर्मगुरु व्हावं असं वाटत होतं. पण त्यासाठी योग्य शिक्षण मिळायला हवं होतं. बेनिटोला त्यानं रॉयल स्कूलमध्ये पाठवलं.



रॉयल स्कूल उत्तम शिक्षणासाठी प्रसिध्द होतं. बेनिटोही उत्साहानं शिकणारा विद्यार्थी होता. मात्र शाळेत दोन स्तर असल्याचं त्याच्या लवकरच लक्षात आलं. एक स्थानिक अमेरिकन विद्यार्थी आणि दुसरे स्पॅनिश/क्रेओल विद्यार्थी. स्थानिक अमेरिकन विद्यार्थ्यांच्या वर्गात शिक्षक नियमितपणे जायचे नाहीत. फारसा न शिकलेला एक सहाय्यक शिक्षकच तिथे शिकवायचा. बेनिटो किंवा त्याच्या सहाध्यायांकडून अभ्यासात चूक झाली तर त्यांना मदतीऐवजी शिक्षा मिळायची.



“मी शिक्षणाच्या त्या चुकीच्या पध्दतीमुळे खूप निराश व्हायचो. मी ज्या शहरात होतो तिथे दुसरी चांगली शाळा नव्हती. तरीही मी ती शाळा सोडायचा निर्णय घेतला. त्यानंतर मी जे शिकलो त्यावरुन स्वतःचं स्वतः पुढे शिकावं. स्वतःचे विचार लिहून काढावेत असं मला वाटत होतं”. असं त्यानं लिहून ठेवलं होतं.

त्यानंतर बेनिटोनं व्याकरण, स्पेलिंग्ज, लिखाणाची शैली स्वतःच शिकून आत्मसात केली. त्यानं डॉन अँटोनियोच्या ग्रंथालयात रात्र रात्र बसून अभ्यास केला. अर्थात बेनिटो फक्त अभ्यासच करत होता असं नाही. आपल्या मित्रांसोबत तो खूप मस्तीही करायचा.





बेनिटो आणि त्याचे मित्र धावणं, उड्या मारणं आणि हुंदडणं खूप आवडायचं. ते एकमेकांच्या खोड्या काढायचे. एकदा त्यांनी टोपलीभर सडलेली सफरचंदं विकत घेतली. मग त्यांनी त्या सफरचंदांचा दारुगोळ्यासारखा वापर केला. बाजारात जे कोणी दिसेल त्यावर सडलेली सफरचंदं फेकली. डॉन अँटोनियोला हे कळल्यावर तो खूप रागावला आणि बेनिटोला चिक्कार मार बसला.

बेनिटोकडे असल्या खोड्यांच्या बाबतीत बर्‍याच क्लृप्त्या होत्या. जवळच्याच एका तलावाच्या किनार्‍यावर त्यानं एक ड्रम आणि लाकडी फळ्यांच्या सहाय्यानं डायव्हिंग बोर्ड तयार केला होता. पहिल्यांदा त्यावरुन त्यानं डाईव्ह मारायचा प्रयत्न केला तेव्हा बेनिटो आणि तो ड्रम एकाचवेळी पाण्यात बुडले. पुढच्या वेळी डायव्हिंग बोर्ड जरा ठीकठाक झाल्यावर त्यानं तो वापरायला चक्क तिकिट लावलं होतं. त्यातून बेनिटोला काही नाणी मिळाली. त्या पैशांमधून तो मित्रांबरोबर कँडी खायचा.

२१ ऑक्टोबर १८२१ रोजी पंधरा वर्षांचा बेनिटो ओक्साकाच्या सेमिनरीत दाखल झाला. पुढच्या चार वर्षांमध्ये तो स्पॅनिश आणि लॅटिनमध्ये पारंगत झाला. १८२५च्या ऑगस्टमध्ये त्याला एक्सलंट म्हणजे सर्वोत्तम असा शेरा मिळाला. बेनिटो जुआरेज तिथे थांबला नाही. त्यानं तत्वज्ञान, कला, धर्म आणि साहित्य या विषयातल शिक्षण चालू ठेवलं.

जसजसं जुआरेज शिकत गेला तसतशी त्याच्या डोक्यात एक योजना साकार होत गेली. धर्मगुरु होण्याऐवजी सरकारमध्ये काम करुन लोकांना मदत करायची असं त्यानं ठरवलं. आपलं ध्येय साध्य करण्यासाठी जुआरेजनं सेमिनरीतलं शिक्षण पूर्ण केलं आणि तो ओक्साकाच्या कला आणि विज्ञान संस्थेच्या विधी महाविद्यालयात दाखल झाला.

तिथे तीन वर्षं मन लावून अभ्यास केल्यावर बेनिटो जुआरेज संस्थेतच सहाय्यक प्राध्यापकाच्या जागेवर रुजू झाला. तो ओक्साकाच्या नगरपरिषदेवरही निवडून आला. राजकारणातल्या त्याच्या कारकीर्दीची ती सुरुवात होती.



पुढच्याच वर्षी म्हणजे १८३२ साली जुआरेज राज्याच्या विधानसभेत निवडून आला. त्याची कीर्ती सगळीकडे पसरायला लागली. जुआरेज विचारवंत, कष्ट करणारा आणि प्रामाणिक असल्याबद्दल त्याची ख्याती होती. प्रत्येक नागरिकाला न्याय मिळवून देण्यासाठी कायद्याचा योग्य वापर हे त्याचं वैशिष्ट्य होतं. तसे कायदे प्रचलित व्हावेत यासाठीही तो झटला.



मेक्सिको तेव्हाही संकटांचा सामना करत होताच. १८२१ साली मेक्सिको स्पेनपासून स्वतंत्र झाला. पण प्रत्यक्षात स्पॅनिश लोकांचं नियंत्रण तसंच होतं. एक केंद्रीय विधानसभा आणि छोट्या छोट्या राज्यांच्या विधानसभाही होत्या. राष्ट्रीय आणि राज्यपातळीवरच्या विधानसभांचे प्रतिनिधी मिळून चर्चा करायचे आणि कायदे ठरवायचे. पण त्या कायद्यांमुळे परिस्थितीत काही फरक पडत नव्हता. ते फक्त लष्कर, चर्च आणि उच्च वर्गापुरतेच होते.

तेव्हा स्थानिक नेत्यांनी अनेक वेळा राज्यसरकारांविरुध्द आंदोलनं केली. पण दरवेळेला त्यांचा पराभव व्हायचा. मेक्सिकन लोकांचा छळ काही थांबत नव्हता. या बंडखोर नेत्यांमध्ये आपले कार्यकर्ते असलेले काही राजकारणी लोक होते. काहीजणांना सत्तेची लालसा होती. काहीजण भ्रष्टाचारी आणि चोर होते. काहीजणांचे हेतू चांगले असले तरी आपलं कार्य पुढे नेण्यासाठी व्यवहारज्ञान नव्हतं.

बेनिटो यापैकी कोणत्याच गटात नव्हता. त्याच्याकडे वक्तृत्वशैली किंवा ग्लॅमर नव्हतं. तो कायम साधे, सुती कपडे घालायचा. रंगीबेरंगी बटणं, फीत किंवा फॅशनेबल पोशाख घालणं त्याच्या स्वभावातच नव्हतं. त्याच्याकडे कार्यकर्त्यांची फौज नव्हती. त्यानं जनतेला काही वचनं दिली नव्हती.

पण तरीही त्याची प्रसिध्दी दिवसेंदिवस वाढतच गेली. एक वकील आणि जनसामान्यांचा प्रतिनिधी या नात्यानं त्यानं फक्त एक प्रश्न उपस्थित केला होता. लोकांना अत्यंत महत्वाचा वाटणारा तो कोणता प्रश्न होता?
जुआरेजनं स्वत:ला विचारलं. गावातल्या लोकांना सर्वात जास्त कशाची गरज आहे. त्याचं उत्तर होतं – गरिबीतून वर येण्याची संधी. त्यांना आपल्या शेतात चांगली लागवड करण्यासाठी पैशांची गरज होती. उगवलेलं धान्य शहरापर्यंत पोचवण्यासाठी चांगल्या रस्त्यांची गरज होती.

मेक्सिकोच्या अनेक समस्यांपैकी रस्त्यांची उणीव ही प्रमुख समस्या आहे असं जुआरेजला वाटत होतं. गावांना जोडणारे तेव्हाचे रस्ते कच्चे, खाचखळग्यांनी आणि चिखलानं भरलेले होते. जुआरेजला गावातल्या लोकांना शहरात जाऊन धान्य विकता यावं यासाठी रस्त्यांचा दर्जा सुधारणं अत्यावश्यक वाटत होतं.

मेक्सिकोच्या संविधानात सर्व नागरिकांना समान अधिकार हा कायदा असावा असंही जुआरेजला वाटत होतं. जुआरेज युनायटेड स्टेटस ऑफ अमेरिकामध्ये सर्व नागरिकांना समान अधिकार हा ठराव मांडणार्‍यांच्या बाजूचा होता.

आयुष्यभर जुआरेज आपल्या आदर्शांसाठी झगडला. त्यानं अनेक उच्चं पदं भूषवली. मेक्सिकोच्या राष्ट्रीय काँग्रेसमध्ये तो सहन्यायाधीश, कायदेमंत्री, ओक्साकाचा राज्यपाल, मुख्य न्यायाधीस आणि अंतर्गत मंत्री झाला. १८६१ साली बेनिटो जुआरेज मेक्सिकोचा राष्ट्रपती म्हणून निवडून आला. ते आणि मार्गारिटा ही त्यांची पत्नी (डॉन अँटोनियो माजाची मुलगी - डॉन अँटोनियोच्या घरी बेनिटो १२ वर्षं रहात होता) राष्ट्रपती निवासात अत्यंत साधेपणानं रहायचे.



जुआरेजची कारकीर्द सरळ वाटेनं कधी गेली नाही. अनेकवेळा त्यानं सरकारी पदं सोडली. सत्तालोलुप, भ्रष्ट, गुन्हेगारी वृत्तीच्या, हुकूमशाही प्रवृत्तीच्या लोकांना विरोध करण्याचा तो त्याचा मार्ग होता. आपल्या कुटिल नीतीत सहभागी व्हायला नकार दिला या कारणास्तव हुकूमशहांनी दोनवेळा जुआरेजला मेक्सिकोबाहेर हाकललं. कदाचित याच कारणानं त्यांना लोकांचं प्रेम लाभलं. दरवेळेला मेक्सिकोत परतल्यावर जुआरेजचं भव्य स्वागत झालं.

अमेरिकेतल्या यादवी युध्दाच्या काळात बेनिटो जुआरेज मेक्सिकोचा राष्ट्रपती होता. तो अब्राहम लिंकनच्या राज्यकारभाराची प्रशंसा करायचा. जुआरेजला गुलामगिरीबद्दल तिरस्कार होता. यामुळे त्यांनी (लिंकनच्या विरोधात असलेल्या) अमेरिकेच्या कॉन्फेडेरेटीसोबत व्यापार करायला नकार दिला. यामुळे मेक्सिकोचं आर्थिक नुकसान झालं. पण न्यायानं वागणं हे पैशांपेक्षा जुआरेज जास्त महत्वाचं मानत होता.



काही मेक्सिकन नेत्यांचे विचार मात्र वेगळे होते. त्यांना कॉन्फेडेरेटीबरोबर सहकार्य करुन धन आणि सत्ता काबीज करता येईल हे दिसत होतं. मग त्यांनी उत्तर मेक्सिकोमध्ये स्वतंत्र साम्राज्य प्रस्थापित करण्याचा घाट घातला. कॉन्फेडेरेटीच्या लोकांना त्या राज्यात बिनधोकपणे काम करता आलं असतं. जुआरेजच्या शत्रुपक्षातल्या लोकांनी कॉन्फेडेरेटीच्या नेत्यांना – "तुम्ही अमेरिकेच्या युनियन फोर्सेबरोबर युध्द करुन या प्रदेशात निर्धोकपणे लपून रहा. अमेरिकेचं सरकार मेक्सिकोच्या या सीमेवर तुमच्या मागे येऊ शकणार नाही. कारण सीमापार करुन येणं म्हणजे मेक्सिकोबरोबर युध्द ओढवून घेण्यासारखं आहे. सगळे युरोपातले देश मेक्सिकोला पाठिंबा देतील. त्यामुळे राष्ट्राध्यक्ष लिंकन असा विचार कधीच करणार नाहीत." असं सांगितलं होतं. जुआरेजच्या शत्रूपक्षातल्या लोकांना जुआरेजचं सरकार यामुळे उलथून लावता येईल असं वाटत होतं.



पण मेक्सिकन लोकांच्या पाठिंब्यामुळे हे षडयंत्र रचणार्‍या लोकांचा जुआरेजनं पराभव केला. त्याची लिंकन या राष्ट्राध्यक्षांशी दाट मैत्री झाली. या कठीण प्रसंगात अमेरिकेसमोर मैत्रीचा हात पुढे केल्याबद्दल लिंकननं जुआरेजचे आभार मानले.



आपला १८७२ साली मृत्यू होईपर्यंत जुआरेज मेक्सिकोचा राष्ट्रपती होता. त्याला निवृत्त व्हायचं होतं पण जनतेनं एक प्रामाणिक सरकार देणारा नेता म्हणूनच त्याच्याकडे पाहिलं आणि त्याला वारंवार निवडून दिलं.



राष्ट्रपतीपदावर असताना जुआरेजनं गरीब आणि अशिक्षित लोकांसाठी खूप कार्य केलं. बंदरापासून मेक्सिकोच्या राजधानीपर्यंत आणि मेक्सिको शहरापर्यंत अनेक रस्ते बांधले. प्रत्येक मुलाला शिक्षण मोफत मिळावं या कायद्यासाठी खूप काळ संघर्ष केला. त्यांनी केलेल्या सुधारणांमुळे सर्व नागरिकांना समान संधी मिळायला लागली. जुआरेजच्या नेतृत्वाखाली मेक्सिकोची अखेरीस स्वतंत्र देश म्हणून उन्नती झाली. मेक्सिकोत आता प्रत्येकाला आपलं भविष्य घडवण्याची शक्ती आणि क्षमता प्राप्त झाली.

“बेनिटो जुआरेज म्हणजेच मेक्सिको आणि मेक्सिको म्हणजेच जुआरेज..” असं अँड्रेस एडुआर्ड या प्रसिध्द मेक्सिकन साहित्यिकानं लिहिलं होतं. **डोंगराळ भागात जन्म घेतलेला हा मुलगा अखेरीस आपल्या देशाचं महान प्रतीक बनला.**

समाप्त

